**जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदांना सन २०१५-१६ या वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१५/प्र.क्र. २/फ-३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक :- २६ फेब्रुवारी, २०१५.

पहा :-

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०१४/प्र.क्र.२१/फ-३, दिनांक २९ मार्च, २०१४.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ फॉरेस्ट फोर्स) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२२/१४-१५/१३३८; दिनांक १७ नोव्हेंबर, २०१४

**शासन निर्णय :-**

वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदे दिनांक २८.२.२०१५ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने संदर्भ क्रमांक १ अन्वये यापूर्वी मान्यता दिली होती. सदर २० अस्थायी पदांना आता दिनांक २९.२.२०१६ पर्यंत चालू ठेवण्याची प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ फॉरेस्ट फोर्स), यांनी मागणी केलेली आहे. त्यानुषंगाने **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार २० अस्थायी पदे दिनांक १.३.२०१५ ते दिनांक २९.२.२०१६ पर्यंत चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर २० अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालवधीसाठी रिक्त नाहीत.

ब) सदर २० अस्थायी पदे वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती मान्य केलेल्या आकृतीबंधातील २५०२५ पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

या पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुननिर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षा खाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा

हा शासन निर्णय वित्त विभागाचे क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१ दिनांक ४.१०.२००४ च्या शासन निर्णयास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०२२६१६२४५४३४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.02.26 16:35:39 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
४. मुख्य वनसंरक्षक, ठाणे/ पुणे/ कोल्हापूर/ चंद्रपूर/ औरंगाबाद.
५. वनसंरक्षक, चंद्रपूर वनवृत्त, चंद्रपूर.
६. वनसंरक्षक, कार्यआयोजना वनवृत्त, नागपूर.
७. वनजमाबंदी अधिकारी, भोर, जि. पुणे.
८. वनजमाबंदी अधिकारी, मराठवाडा विभाग, औरंगाबाद.
९. वनजमाबंदी अधिकारी, सावंतवाडी, जि.सिंधुदूर्ग.
१०.वनजमाबंदी अधिकारी, चंद्रपूर.
११.महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२.महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३.नियोजन विभाग, (योजना-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१४.वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५.ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१६.फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१७. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**प्रपत्र-अ**

| अ.क्र. | पदनाम. | पद संख्या | पदांचा वृत्तनिहाय तपशिल |
|---|---|---|---|
| १ | वनजमाबंदी अधिकारी | ४ | (पुणे-१ /औरंगाबाद-१ /कोल्हापूर-१/ चंद्रपूर-१) |
| २ | वनपाल | १ | (कोल्हापूर-१) |
| ३ | मंडळ अधिकारी | १ | (पुणे-१) |
| ४ | पहारेकरी | १ | (चंद्रपूर -१) |
| ५ | लेखापाल | १ | (पुणे-१) |
| ६ | वनसर्व्हेक्षक | ५ | (पुणे-१/ठाणे-३/औरंगाबाद-१) |
| ७ | वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ | (पुणे-१) |
| ८ | चेनमन | २ | (ठाणे-२) |
| ९ | चपराशी | २ | (पुणे-१ / प.मुंबई (वन्यजीव)) |
| १० | जीपचालक | २ | (पुणे-१/ चंद्रपूर -१) |
| एकूण | | **२० पदे** | |

********